केंद्र शासनाच्या सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे या संस्थेत १६ पदे कंत्राटी पद्धतीने निर्माण करुन एकत्रित वेतनावर भरण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन निर्णय क्रमांक : एलईसी-४३२१/प्र.क्र.४१९/वैसवा-३
गो.ते.रुग्णालय आवार,नवीन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २२ डिसेंबर, २०२१.

वाचा :
१. महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे यांचे पत्र क्र.ममाआसं/पुणे/सेंऑए/पाठ्यक्रम /३६३/ २०१८, दिनांक ०९.०२.२०१८
२. शासन पत्र, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१९/प्र.क्र.३६/१९/आपुक, दिनांक १६.०५.२०१९

**प्रस्तावना** :-

विभागाच्या नियंत्रणाखालील महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे या संस्थेस केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे मार्फत सेंटर ऑफ एक्सलन्स ही योजना राबविण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर योजनेतंर्गत महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे या संस्थेस केंद्र शासनामार्फत बांधकाम, मनुष्यबळ, यंत्रसामुग्री खरेदी इत्यादी बाबींसाठी रुपये ३० कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ०७.०३.२०१९ च्या बैठकीत प्राप्त मान्यतेनुसार केंद्र शासनाच्या उपरोक्त योजनेतंर्गत महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे येथे सुरू करावयाच्या विविध अभ्यासक्रमांसाठी सदर संस्थेच्या आस्थापनेवर एकूण १६ पदे तीन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास व ती एकत्रित वेतनावर भरण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात एकत्रित वेतनावर कंत्राटी पध्दतीने भरण्याबाबतच्या मान्यतेच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :

वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक १६.०५.२०१९ च्या पत्रान्वये कळविण्यात आल्याप्रमाणे

दिनांक ०७.०३.२०१९ रोजी आयोजित उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीचे इतिवृत्तात प्राप्त मान्यतेनुसार महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे या संस्थेस केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय,नवी दिल्ली यांचे मार्फत सेंटर ऑफ एक्सलन्स या योजनेंतर्गत सुरू करावयाच्या विविध अभ्यासक्रमांसाठी खालील एकूण १६ पदे तीन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास व ती एकत्रित वेतनावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पध्दतीने भरण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र . | विभाग | पदनाम | एकूण पदसंख्या | एका पदासाठी दरमाह एकत्रित वेतन रुपये | एकूण मासिक वेतन रुपये (एकत्रित) |
|---|---|---|---|---|---|
| १ | मनोविकृतीशास्त्र (Psychiatry) | प्राध्यापक | १ | ७५००० | ७५००० |
| | | सहयोगी प्राध्यापक | १ | ६५००० | ६५००० |
| | | सहायक प्राध्यापक | १ | ५५००० | ५५००० |
| २ | चिकित्सा मानसशास्त्र (Clinical Psychology) | सहयोगी प्राध्यापक | १ | ५५००० | ५५००० |
| | | सहायक प्राध्यापक | १ | ४५००० | ४५००० |
| | | चिकित्सा मानसशास्त्रज्ञ | ४ | ३०००० | १२०००० |
| ३ | मनोविकृती सामाजिक कार्य | सहयोगी प्राध्यापक | १ | ५५००० | ५५००० |
| | | सहायक प्राध्यापक | १ | ४५००० | ४५००० |
| | | मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता | २ | ३०००० | ६०००० |
| ४ | मानसोपचार परिचर्या (Psychiatric Nursing) | सहयोगी प्राध्यापक | १ | ५५००० | ५५००० |
| | | सहायक प्राध्यापक | १ | ४५००० | ४५००० |
| | | टयुटर | १ | २५००० | २५००० |
| एकूण | | | १६ | ५८०००० | ७००००० |

२. उपरोक्त सर्व पदांसाठी खालीलप्रमाणे निवडमंडळ गठीत करण्यास व त्यामार्फत पदभरती करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक-प्राध्यापक,महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था,पुणे | सदस्य सचिव |
| ३ | अधिष्ठाता, बै.जी.शा.वै.म. पुणे | सदस्य |
| ४ | नॅशनल इन्स्टिट्युट ऑफ मेन्टल हेल्थ ॲन्ड न्युरो सायन्स (NIMHANS) या संस्थेचा प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | प्राध्यापक व विभाग प्रमुख मनोविकृतीशास्त्र विभाग, बै.जी.शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे | सदस्य |
| ६ | प्राध्यापक/ सहयोगी प्राध्यापक(मागासवर्गीय प्रतिनिधी), बै.जी.शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे | सदस्य |

निवडमंडळाचे सदस्य-सचिव या नात्याने प्रस्तावांतर्गत कंत्राटी पदभरतीसाठी जाहिरात प्रसिध्द करुन त्यास व्यापक प्रसिध्दी देण्याबाबतची, पात्र उमेदवारांच्या मुलाखती घेण्याबाबतची,

गुणांकनानुसार निकाल जाहीर करुन उमेदवारांना नियुक्ती देण्याबाबतची सर्व व्यवस्था करण्याची जबाबदारी संचालक-प्राध्यापक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था यांची असेल.

३. सदर पदे नियमित वेतनश्रेणीत न भरता ती उपरोक्त एकत्रित वेतनावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पद्धतीने खालील अटींच्या अधीन राहून भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) करार पध्दतीने नियुक्तीचा कालावधी हा ३६४ दिवस इतका असेल.

(२) उमेदवाराचे कामकाज समाधानकारक नसल्यास, गंभीर स्वरुपाची अनियमितता व गैरवर्तणूक या कारणासाठी त्याची नियुक्ती कोणत्याही पूर्वसूचनेशिवाय संपुष्टात येईल.

(३) करार पध्दतीने नियुक्त उमेदवाराने प्रस्थापित मानकांनुसार अध्यापन, रुग्णसेवा व अधिष्ठाता यांनी नेमून दिलेली विवक्षित कामे पार पाडणे आवश्यक राहील.

(४) वरीलप्रमाणे विहीत कामकाज पार पाडल्यानंतर महाविद्यालयीन व रुग्णालयीन कर्तव्य व जबाबदा-यांवर विपरीत परिणाम होणार नाही याची दक्षता घेऊन उमेदवारास यथास्थिती सक्षम प्राधिकाऱ्याच्या पुर्व परवानगीने खाजगी व्यवसाय करण्याची मुभा राहील.

(५) करार पध्दतीने नियुक्त उमेदवारांना नियमित नियुक्तीसाठी कोणताही हक्क राहणार नाही. सदर पदांची नेमणूक ही पूर्णत: कंत्राटी पद्धतीची असेल. या अधिकारी/ कर्मचा-यांना शासकीय कर्मचारी म्हणून गणले जाणार नाही. संचालक-प्राध्यापक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था हे उपरोक्त सर्व पदांसाठी नियुक्ती प्राधिकारी असतील.

(६) करार पध्दतीने नियुक्त उमेदवारास त्याच्या सेवा कालावधीत केवळ नैमितिक रजा अनुज्ञेय असतील.

(७) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांना प्राप्त होणा-या कागदपत्रे/माहिती व आधारसामुग्रीबाबत गोपनीयता पाळणे आवश्यक राहील.

(८) करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींना कोणत्याही प्रकारचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करता येणार नाहीत.

(९) उमेदवाराच्या कामकाजाचे मुल्यांकन होणे आवश्यक आहे. यासाठी संचालक-प्राध्यापक यांनी दर तीन महिन्यांनी उमेदवाराच्या कामकाजाचा तपशीलवार आढावा स्वत:च्या अभिप्रायासह आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांना सादर करावा.

(१०) संबंधित विषयाच्या पदव्युत्तर अथवा पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांकडून उमेदवाराच्या शैक्षणिक कामकाजासंदर्भात मुल्यांकन करण्याच्यादृष्टीने अभिमत (Feedback) घेण्यासाठी अध्यापन कौशल्य, वक्तशीरपणा, सचोटी इत्यादी

निकषाच्या आधारे निश्चित करण्यात आलेल्या दहा गुणांच्या प्रश्नावलीवर गुणांकन प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

(११) रुग्णसेवेसंदर्भात अभिमत (Feedback) घेण्यासाठी काही प्रसंगी रुग्णांकडून स्वतंत्र प्रश्नावलीच्या आधारे गुणांकन प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

(१२) १० गुणांच्या प्रश्नावलीवर तसेच रुग्णसेवेसंदर्भातील प्रश्नावलीवर प्राप्त गुणांकनाचा अहवाल संचालक-प्राध्यापक यांनी आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांना सादर करावा.

(१३) उमेदवाराचे काम समाधानकारक असल्यास व संस्थेची निकड असल्यास उमेदवारास प्रथम नियुक्तीचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर सेवेत तांत्रिक खंड देऊन पुढील ३६४ दिवसांकरिता पुनर्नियुक्ती देता येईल. तथापि अशा प्रकारच्या पुनर्नियुक्त्या उमेदवाराने त्याच्या वयाची ७० वर्षे पूर्ण केल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत देय असणार नाहीत.

(१४) पुनर्नियुक्ती देण्यासाठी संचालक-प्राध्यापक यांनी आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांना स्वत:च्या अभिप्रायासह सादर केलेले तिमाही अहवाल तसेच प्रश्नावलीबाबतचे अभिलेख विचारात घेवून पुर्ननियुक्तीबाबतची कार्यवाही करण्यात यावी. तिमाही अहवाल समाधानकारक असल्यास त्याचप्रमाणे दहा गुणांच्या प्रश्नावलीत उमेदवारास किमान आठ गूण प्राप्त होत असल्यास उमेदवारास आयुक्तांच्या मान्यतेने पुनर्नियुक्ती देता येईल. प्रस्तावांतर्गत पदे हे तीन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्यात येत असल्यामुळे त्यानंतरच्या कालावधीसाठी कोणत्याही परिस्थितीत पुर्ननियुक्ती देता येणार नाही.

(१५) उमेदवारास प्रथम नियुक्ती अथवा पुनर्नियुक्ती देण्यात आल्यानंतर किमान एक शैक्षणिक सत्र संपेपर्यंत त्यास कोणत्याही परिस्थितीत सेवा सोडता येणार नाही. तशा आशयाचे शपथपत्र उमेदवारास नियुक्तीपूर्वी सादर करणे बंधनकारक असेल. असे शपथपत्र सादर करणा-या उमेदवारासच करार पध्दतीने नियुक्ती देण्यात यावी. त्यामुळे शैक्षणिक सत्र चालू असलेल्या कालावधीत विद्यार्थीहित विचारात घेता उमेदवाराचा राजीनामा कोणत्याही परिस्थितीत स्वीकारला जाणार नाही.

(१६) कंत्राटी पद्धतीने नियुक्ती करावयाच्या पदांसाठी आवश्यक शैक्षणिक अर्हता व अनुभव याबाबतचा तपशील सोबतच्या “परिशिष्ट-अ” मध्ये देण्यात आला आहे.

(१७) संबंधित नियुक्ती प्राधिकारी शासनाच्या वतीने नियुक्तीच्या वेळी संबंधितांबरोबर विहित प्रपत्रात करार करतील. कराराचे विहित प्रपत्र “परिशिष्ट-ब” मध्ये देण्यात आले आहे. कराराची सर्व कागदपत्रे जतन करुन ठेवणे ही संबंधित कार्यालयाची जबाबदारी असेल.

(१८) उपरोक्त पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या याबाबतचा तपशील “परिशिष्ट-क” मध्ये नमूद करण्यात आला आहे.

४. सदर बाबींकरीता येणारा खर्च महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे यांना केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे मार्फत सेंटर ऑफ एक्सलन्स या योजनेंतर्गत प्राप्त निधीतून भागविण्यात येईल.

५. मा.उच्च स्तरीय सचिव समितीच्या दिनांक ०७.०३.२०१९ रोजी आयोजित बैठकीतील सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२२१५१७०५४०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sampatrao Patankar

Digitally signed by Shivaji Sampatrao Patankar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99270d58a9b5eee189cedaf5d07b490751c0b9a3ad283cb0f2aa1c67e62fd0d, serialNumber=6b9623012ceb36169f87af4c1b6870fe8d2120e02fda1ff2c017fe617cdeda5c, cn=Shivaji Sampatrao Patankar
Date: 2021.12.22 17:29:28 +05'30'

(शिवाजी पाटणकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
२) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा. राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
९) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१०) संचालक-प्राध्यापक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था,पुणे
११)अधिष्ठाता, बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) निवडनस्ती/वैसेवा-३.

शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एलईसी-४३२१/प्र.क्र.४१९/वैसेवा-३, दिनांक २२ डिसेंबर, २०२१ चे सहपत्र

परिशिष्ट "अ"

| अ.क्र. | पदाचे नाव | आवश्यक शैक्षणिक अर्हता व अनुभव | वयोमर्यादा |
|---|---|---|---|
| १ | प्राध्यापक मनोविकृतीशास्त्र, गट - अ | राष्ट्रीय वैद्यकीय आयोगाने (NMC) वेळोवेळी त्या-त्या पदासाठी निश्चित केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव | आवश्यक अर्हता व अनुभव धारण करणारे कोणत्याही वयोगटाचे उमेदवार सदर पदावरील नियुक्तीसाठी पात्र असतील. तथापि वयाची ७० वर्षे पुर्ण झाल्यानंतर अशा उमेदवारांना नियुक्ती अथवा यथास्थिती पूर्ननियुक्ती देता येणार नाही. |
| २ | सहयोगी प्राध्यापक, मनोविकृतीशास्त्र, गट-अ | | |
| ३ | सहायक प्राध्यापक, मनोविकृतीशास्त्र, गट-ब | | |
| ४ | सहयोगी प्राध्यापक, चिकित्सा मानसशास्त्र, गट - अ | भारतीय पुनर्वसन परिषदेने (RCI) वेळोवेळी त्या-त्या पदासाठी निश्चित केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव | आवश्यक अर्हता व अनुभव धारण करणारे कोणत्याही वयोगटाचे उमेदवार सदर पदावरील नियुक्तीसाठी पात्र असतील. तथापि वयाची ७० वर्षे पुर्ण झाल्यानंतर अशा उमेदवारांना नियुक्ती अथवा यथास्थिती पूर्ननियुक्ती देता येणार नाही. |
| ५ | सहायक प्राध्यापक, चिकित्सा मानसशास्त्र, गट - ब | | |
| ६ | चिकित्सा मानसशास्त्रज्ञ, गट -क | | कमाल वयोमर्यादा ४० वर्षे इतकी राहील. |
| ७ | सहयोगी प्राध्यापक, मनोविकृती सामाजिक कार्य गट - अ : | केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटूंब कल्याण मंत्रालयाने त्यांच्या अधिनस्त संस्थामधील पदभरतीच्या अनुषंगाने वेळोवेळी अधिसूचित केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव या पदांसाठी लागू राहील | अध्यापकीय पदांसाठी आवश्यक अर्हता व अनुभव धारण करणारे कोणत्याही वयोगटाचे उमेदवार सदर पदावरील नियुक्तीसाठी पात्र असतील. तथापि वयाची ७० वर्षे पुर्ण झाल्यानंतर अशा उमेदवारांना नियुक्ती अथवा यथास्थिती पूर्ननियुक्ती देता येणार नाही. |
| ८ | सहायक प्राध्यापक, मनोविकृती सामाजिक कार्य गट - ब | | |
| ९ | मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता, गट - क | मानसिक आरोग्य संगोपन कायदा २०१७ (Mental Health Care Act-२०१७) मध्ये नमूद अर्हता व अनुभव | कमाल वयोमर्यादा ४० वर्षे इतकी राहील. |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | सहयोगी प्राध्यापक, मानसोपचार परिचर्या | भारतीय परिचर्या परिषदेने (INC) वेळोवेळी निश्चित केलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव | अध्यापकीय पदांसाठी आवश्यक अर्हता व अनुभव धारण करणारे कोणत्याही वयोगटाचे उमेदवार सदर पदावरील नियुक्तीसाठी पात्र असतील. तथापि वयाची ७० वर्षे पुर्ण झाल्यानंतर अशा उमेदवारांना नियुक्ती अथवा यथास्थिती पूर्ननियुक्ती देता येणार नाही. |
| ११ | सहायक प्राध्यापक, मानसोपचार परिचर्या | | |
| १२ | ट्युटर, मानसोपचार परिचर्या | | कमाल वयोमर्यादा ४० वर्षे इतकी राहील. |

शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एलईसी-४३२१/प्र.क्र.४१९/वैसेवा-३, दिनांक २२ डिसेंबर, २०२१ चे सहपत्र

परिशिष्ट "ब"

**AGREEMENT**

This agreement is made at ___________________ on __________ between the Governer of State of Maharashtra exercising the executive Powers of the government of State of Maharashtra through Shri ________________________ COMPETENT AUTHORITY, having his office at __________________________ , herein after refer to as, "the GOVERNMENT" of the first party AND, Shri / Smt_________________________ age ____________ residing at __________________________ herein after refer to as the second party.

**WHEREAS** the Government has decided to recruit the post of_______________________on contract basis. Accordingly, the Government Medical Education and Drugs Department has issued Government resolution number__________ dated __________

**AND WHEREAS** the Government had published advertisement in Daily News paper on __________ regarding recruitment for the post of ____________

**AND WHEREAS** in persuance to the above advertisement the candidates who applied for the post of _______ possessing minimum qualification prescribed for the post of ___________ by the competent authority and were called for interview for the said post of ______________

**AND WHEREAS** after holding interview of Candidates called for interview for the post of ______________ Shri / Smt _______________ is selected by the selection board constituted by the Government.

**AND WHEREAS** the Government vide its letter number _______ dated _________ has communicated to Shri / Smt _______________ regarding his / her selection as a ___________ for a period of 11 months on the consolidated salary of Rs. ____________ , (Rupees___________________ only) and on the terms and conditions as stated here in below.

**AND WHEREAS** Shri / Smt _______________ has vide his / her letter dated ____________ accepted the offer regarding appointment as a _____________ by the competent authority on contract basis, on the terms and conditions prescribed in this agreement.

**AND WHEREAS** Shri / Smt _______________has therefore to execute an agreement.

**NOW THIS AGREEMENT WITNESS AND IT IS HEREBY AGREED AND DECLARED BY AND BETWEEN THE PARTIES HERE TO AS FOLLOWS :**

1. The first party hereby agrees to appoint Shri / Smt ________________ (Party No II) as a ___________________ on contract basis for a period of 364 days commencing from ________ to ___________ (mention date) on consolidated remuneration of Rs.___________ (Rupees _________________ only) per month and said remuneration will be payble at the end of each calender month according to British calender. It is agreed that IInd party shall not be entitled for seperate TA and DA during the contract period. However compenent authority may sanction the TA under compelling and exceptional circumstances.

2. The Director Professor, Maharashtra Institute of Mental Heallth, Pune will have full administrative control over the IInd party and IInd party is bound to perform duties, as

per their general and special instructions. Failure to do so shall be treated as breach and will be liable for termination of this contract.

3. List of duties for post of __________________ is annexed to this agreement as schedule I. It is agreed that duties prescribed in this schedule 1 are not exhaustive but are illustrative and IInd party will be bound to perform its duties, as directed by competent authority from time to time. The party no. II shall carry out its duties as ___________ and excute orders / instructions issued by the first party with due diligence and efficiency during period of contract.
4. In case of any default on the part of the party number II if the Government suffers financial loss or damage, then the Government will be at liberty to recover the said loss / damage from party no. II.
5. Assignment of 364 days contract is renewable subject to the conditions laid down in para (3) of the present resolutioin.
6. The party no. II will not be entitled to claim any rights, interest, benefits, whatsoever of the permanent service in the Government.
7. The first party will be at liberty to terminate this agreement without assigning any reasons before completion of the tenure of 364 days and without giving prior notice in writing.
8. The party no. II will not be able to resign till on going acadmic session is completed.
9. The party no. II shall hold in confidence and shall not disclose to any person any information, documents, official secrets from office record assigned to it. The party no. II shall take due care to maintain the confidentiality of such information, documents, official secrets. The party no. II shall be fully responsible for any disclosure or misuse of such information, documents and official secrets. The IInd party will have to maintain utmost secrecy and confidentiality at all times as regards any information of knowledge obtained / gathered during the said contractual period and will not indulge in any activity prejudicial to the interest of the Medical Education and Drug Department or Government.
10. The normal working hours of ______________ shall be as determined by the concerned competent authority from time to time.
11. If at any time the Competent authority is of the opinion that integrity of the IInd party is doubtful or IInd party behave in a disorderly or in a negligent manner or violated any term / condition of this contract, then in that event, without giving any notice the contract shall stand terminated.
12. After termination of this agreement the party no II shall be bound to return all the office record, papers, documents, books or other material in its custody to the party no. I.
13. The party no. II shall not be entitled to any kind of leave except casual leave and he / she will not leave the head quarter without prior permission of the competent authority during the period of contract.

14. Absence of the IInd party at work for more than 10 days without any sufficient cause, would automatically amount to termination of this contract without any notice or intimation to the IInd party by the competent authority. And IInd party shall not be entitled for the remuneration for the said period of absence.
15. In case the party no. II could not attend the work for any reason and remains absent with previous permission of the competent authority, party no. II shall be entitled to proportionate remuneration for the period he actually attended the work.
16. It is agreed that during the aforesaid period of contract IInd party will not undertake any private work / profession as legal practioner, except after taking special permission from the Competent Authority. If the competent authority is satisfied that such work affects the performance of duties and the same is against interest of state, the competent authority may refuse permission of such work. Despite such refusal of permission, if IInd party accept / continue to do the private work, this agreement / appointment shall stand terminated and if any loss / damage is caused to the government due to such act of the IInd party, he / she will be liable for action as per law.
17. The party no. II shall not delegate any of his / her rights and duties and obligation under this agreement to any third person.

In witness whereof, the parties hereto have both caused this Agreement to be executed the day and year first herein above written.

SIGNED, SEALED AND DELIVERED BY THE

______________
(Name and Designation)
on behalf of the Governor of Maharashtra
Through Competent Authority Shri / Smt ________________ Designation

Ist Party
In the presence of -
1)
2)

SIGNED AND SEALED BY Shri / Smt ________________ Designation
IInd Party
In the presence of -
1)
2)

**शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एलईसी-४३२१/प्र.क्र.४१९/वैसेवा-३, दिनांक २२ डिसेंबर, २०२१ चे सहपत्र**

## परिशिष्ट “क”

**<u>प्राध्यापक, मनोविकृतीशास्त्र, गट - अ पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या</u>** :

१. विभागाशी निगडीत सर्व संबंधीत प्रशासकीय जबाबदाऱ्या पार पाडणे.
२. मनोविकृतीशास्त्र विषयातील विविध पाठ्यक्रमांच्या शैक्षणिक कार्यक्रमाची आखणी करणे व त्याची अंमलबजावणी करणे.
३. विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
४. बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागात रूग्णसेवा देणे.
५. मानसिक आरोग्य क्षेत्रामध्ये निरनिराळे संशोधन कार्यक्रम आखणे व राबविणे.
६. वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**<u>सहयोगी प्राध्यापक ,मनोविकृतीशास्त्र, गट - अ पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या</u>** :

१) संस्थेतील विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
२) बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागात रूग्णसेवा देणे.
३) मानसिक आरोग्य क्षेत्रामध्ये निरनिराळे संशोधन कार्यक्रम आखणे व राबविणे.
४) रुग्ण तपासणीच्या नोंदी नियमित तपासणे व त्यांच्या योग्य उपचारांबाबत मार्गदर्शन करणे.
५) रूग्णांच्या उपचाराबाबतची कागदपत्रे नियमित तपासणे.
६) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**<u>सहाय्यक प्राध्यापक, मनोविकृतीशास्त्र, गट - ब पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या</u>** :

१) संस्थेतील विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
२) बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागात रूग्णसेवा देणे.
३) मानसिक आरोग्य क्षेत्रामध्ये निरनिराळे संशोधन कार्यक्रम आखणे व राबविणे.
४) रुग्ण तपासणीच्या नोंदी नियमित तपासणे व त्यांच्या योग्य उपचारांबाबत विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करणे.
५) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**<u>सहयोगी प्राध्यापक, चिकित्सा मानसशास्त्र, गट - अ पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या</u>** :

१) चिकित्सा मानसशास्त्र विभागाच्या सर्व प्रशासकीय जबाबदाऱ्या पार पाडणे.
२) चिकित्सा मानसशास्त्र विषयातील विविध पाठ्यक्रमांच्या शैक्षणिक कार्यक्रमाची आखणी करणे व त्याची अंमलबजावणी करणे.
३) विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
४) विद्यार्थ्यांना संशोधनाकरीता मार्गदर्शन करणे तसेच स्वत: संशोधन करणे.
५) बाह्य आणि आतंर रुग्णांसाठी मानसशास्त्रीय निदानपर तसेच उपचारात्मक चाचण्या घेणे.
६) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**सहाय्यक प्राध्यापक, चिकित्सा मानसशास्त्र, गट - ब पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१. संस्थेतील विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
२. स्वत: संशोधन करणे व संस्थेतील संशोधन कार्यात सहयोग / मार्गदर्शन करणे.
३. बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागातील रूग्णांसाठी विविध मानसशास्त्रीय चाचण्या, विविध प्रकारचे मानसोपचार देणे.
४. संस्थेतील विविध विद्यार्थ्यांना शोधप्रबंधासाठी मार्गदर्शन करणे.
५. वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**चिकित्सा मानसशास्त्रज्ञ पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१) रूग्णांना विविध मानसशास्त्रीय चाचण्या, विविध प्रकारचे मानसोपचार देणे.
२) संस्थेतील विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना मानसिक चाचण्यांचे प्रशिक्षण देणे आणि विद्यार्थ्यांनी केलेल्या चाचण्यांचे पर्यवेक्षण करणे.
३) Psychology Laboratory ची संपूर्ण जबाबदारी सांभाळणे.
४) चिकित्सा मानसशास्त्रामध्ये संशोधन करणे.
५) सामाजिक स्तरावर मानसिक आरोग्य विषयक जनजागृतीपर कार्य करणे.
६) इतर संस्थांमधून अनुभव प्राप्तीसाठी आलेल्या विद्यार्थ्यांचे पर्यवेक्षण करणे.
७) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**सहयोगी प्राध्यापक, मनोविकृती सामाजिक कार्य, गट - अ पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१) मनोविकृती सामाजिक कार्य विभागाच्या सर्व प्रशासकीय जबाबदाऱ्या पार पाडणे.
२) मनोविकृती सामाजिक कार्य विषयातील विविध पाठ्यक्रमांच्या शैक्षणिक कार्यक्रमाची आखणी करणे व त्याची अंमलबजावणी करणे.
३) विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
४) विद्यार्थ्यांना संशोधनाकरीता मार्गदर्शन करणे तसेच स्वत: संशोधन करणे.
५) बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागातील रूग्णांना विविध उपचारपद्धती देणे व विद्यार्थ्यांना प्रशिक्षण देणे.
६) सामाजिक स्तरावर मानसिक आरोग्य विषयक जनजागृतीपर कार्य करणे.
७) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**सहायक प्राध्यापक, मनोविकृती सामाजिक कार्य, गट - ब पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१. मनोविकृती सामाजिक कार्य विषयातील विविध पाठ्यक्रमांच्या शैक्षणिक कार्यक्रमाची आखणी करणे व त्याची अंमलबजावणी करणे.
२. विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
३. विद्यार्थ्यांना संशोधनाकरीता मार्गदर्शन करणे तसेच स्वत: संशोधन करणे.
४. बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागातील रूग्णांना विविध उपचार पद्धती देणे.

५. विद्यार्थ्यांना विविध उपचार पद्धतींचे प्रशिक्षण देणे व त्यांचे पर्यवेक्षण करणे.
६. सामाजिक संस्थांच्या सहकार्याने मानसिक आरोग्य विषयक विविध उपक्रम राबविणे.
७. मानसिक आरोग्य विषयक जनजागृतीपर कार्य करणे.
८. वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**मनोविकृती सामाजिक कार्यकर्ता, गट - क पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१) रूग्णांना विविध प्रकारच्या उपचार पद्धती देणे.
२) संस्थेतील विद्यार्थ्यांना विविध उपचार पद्धतींचे प्रशिक्षण देणे व पर्यवेक्षण करणे.
३) संस्थेतील विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे व प्रात्यक्षिक देणे.
४) रूग्ण कल्याणकारी सुविधांची जबाबदारी पार पाडणे.
५) सामाजिक स्तरावर मानसिक आरोग्य विषयक जनजागृतीपर कार्य करणे.
६) संस्था व इतर संघटना यांच्यामध्ये विविध उपक्रम राबविण्यासाठी दुवा म्हणून काम करणे.
७) पुनर्वसन केंद्र सुरळीतपणे चालविणे.
८) इतर संस्थांमधून अनुभव प्राप्तीसाठी आलेल्या विद्यार्थ्यांचे पर्यवेक्षण करणे.
९) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**सहयोगी प्राध्यापक, सायकॅट्रीक नर्सिंग गट - अ पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१) सायकॅट्रीक नर्सिंग विभागाच्या सर्व प्रशासकीय जबाबदाऱ्या पार पाडणे.
२) सायकॅट्रीक नर्सिंग विषयातील विविध पाठ्यक्रमांच्या शैक्षणिक कार्यक्रमाची आखणी करणे व त्याची अंमलबजावणी करणे.
३) विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
४) विद्यार्थ्यांना संशोधनाकरीता मार्गदर्शन करणे तसेच स्वत: संशोधन करणे.
५) बाह्य आणि आंतररुग्णांसाठी विविध उपचारपध्दती राबविणे.
६) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**सहायक प्राध्यापक, सायकॅट्रीक नर्सिंग गट - ब पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या** :

१. विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना अध्यापन करणे.
२. विद्यार्थ्यांना संशोधनाकरीता मार्गदर्शन करणे तसेच स्वत: संशोधन करणे.
३. बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागातील रूग्णांना विविध उपचारपद्धती देणे.
४. विद्यार्थ्यांना विविध उपचारपद्धतींचे प्रशिक्षण देणे व त्यांचे पर्यवेक्षण करणे.
५. परिचारीकांना वेळोवेळी मार्गदर्शन करून त्यांना सहयोग करून संशोधन उपक्रमात मार्गदर्शन करणे.
६. वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

**<u>सायकॅट्रीक नर्सिंग टयुटर, गट - क पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :</u>**

१) सायकॅट्रीक नर्सिंग विभागातील विविध पाठ्यक्रमाच्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन व अध्यापन करणे.

२) बाह्यरूग्ण व आंतररूग्ण विभागातील रूग्णांना विविध उपचारपद्धती व रूग्णसेवा देणे.

३) विद्यार्थ्यांना विविध उपचारपद्धतींचे प्रशिक्षण देणे व त्यांचे पर्यवेक्षण करणे.

४) इतर संस्थांमधून अनुभव प्राप्तीसाठी आलेल्या विद्यार्थ्यांचे पर्यवेक्षण करणे.

५) गरजेनुसार इतर अतिथी व्याख्यातांना मार्गदर्शनासाठी आमंत्रित करणे.

६) वरिष्ठांनी दिलेल्या इतर जबाबदाऱ्या पार पाडणे.

********